राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम अंतर्गत बिडगांव, तरोडी (खु) संयुक्त पाणी पुरवठा योजना (ता. कामठी, जि. नागपूर) या योजनेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः ग्रापापु-१११८/ प्र.क्र. १६७/पापु-१३**
**मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मुंबई-४०० ०३२**
**तारीखः ६ जून, २०१८.**

वाचा -

१) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शासन निर्णय क्रमांक ग्रापपु-२०१२/प्र.क्र. ७३/पापु-१३, दि. ३१/१/२०१४.
२) शासन पत्र क्रमांक सुप्रमा-१११४/प्र.क्र. २८१/पापु-१३, दि. ५/११/२१४.
३) मा.मंत्री (पा.पु.व स्व.) यांचे अध्यक्षतेखालील दिनांक ३०/१/२०१८ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त
४) पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शासन निर्णय क्रमांक ग्रापापु-१११८/प्र.क्र. १५५/पापु-१३, दि. २१ मे, २०१८
५) मुख्य अभियंता, म.जि.प्रा. प्रादेशिक विभाग, नागपूर यांचे क्र. मजीप्रा/मुअ(ना)/तांशा-२/९८६/१८, दिनांक १८/५/२०१८ चे तांत्रिक मान्यता आदेश.
६) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण प्रादेशिक विभाग, नागपूर यांचे क्र. मजीप्रा/मुअना/तांशा-२/२४/१८, दि. १८/५/२०१८ चे पत्र.
७) ग्रामीण पाणी पुरवठा योजनांच्या त्रयस्थ तांत्रिक परिक्षणाबाबतचा शासन निर्णय ग्रापाधो-१११४/प्र.क्र.६१/पापु-०७,दि.१५/०६/२०१५ व दि.१४ मार्च, २०१६.

**प्रस्तावना**

नागपूर पेरी अर्बन १० गावे तसेच नागपूर सुधार प्रन्यास यांचे मागणीनुसार समाविष्ट गावे, ता. जि. नागपूर येथील प्रादेशिक नळ पाणी पुरवठा योजनेच्या रु. २३२७४.१९ लक्ष इतक्या किंमतीच्या अंदाजपत्रकास संदर्भ क्र. १ अन्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. तसेच संदर्भ क्रमांक २ येथील पत्रान्वये सदर योजनेच्या जादा दराच्या निविदांना मंजूरी देण्यात आली आहे.

मौजे बिडगाव व तरोडी ही गावे नागपूर पेरी अर्बन योजनेला लागून असून, सदर दोन्ही गावे नागपूर पेरी अर्बन प्रादेशिक योजनेला जोडण्याची संबंधीत गावांकडून मागणी होत होती. याबाबत

मा. मंत्री (पा.पु.व स्व.) यांचे अध्यक्षतेखाली मा.मंत्री (ऊर्जा व राज्य उत्पादन शुल्क) यांचेसमवेत दिनांक ३१/१/२०१८ रोजी झालेल्या बैठकीत बिडगाव व तरोडी ही गावे नागपूर पेरी अर्बन प्रादेशिक योजनेस जोडण्यास तसेच ही गावे जोडण्यासाठी लागणारा खर्च हा नागपूर पेरी अर्बन प्रादेशिक योजनेच्या बचतीतून करण्यास मंजूरीबाबत प्रस्ताव सादर करण्याचे निर्देश देण्यात आले.

बिडगांव व तरोडी (खु) या योजनेकरीता रु. १०.१८ कोटी इतका खर्च प्रस्तावित आहे. सद्यस्थितीत, नागपूर पेरी अर्बन १० गावे योजनेवर रु. २३२.७४ कोटी इतकी रक्कम मंजूरी आहे. योजनेच्या बचतीतून शासन निर्णय दि. २१/५/२०१८ नुसार मंजूर करण्यात आलेला वितरण व्यवस्थेकरीता रु. ८.५१ कोटी निधी मंजूर करण्यात आला आहे. त्यानुसार, योजनेवर एकूण रु. २१५.३६ कोटी अपेक्षित खर्च आहे. त्यानुसार, सदर प्रादेशिक योजनेवर रु. १७.३७ कोटी बचत होत आहे. सदर बचतीतून बिडगाव व तरोडी या पाणी पुरवठा योजनेकरीता लागणारी रक्कम उपलब्ध करुन देण्यात येणार आहे. त्यानुसार बिडगांव व तरोडी या संयुक्त पाण पुरवठा योजनेचया रु. १०१८.६४ लक्ष (ढोबळ) इतक्या किंमतीचे अंदाजपत्रकास संदर्भ क्र.५ अन्वये मुख्य अभियंता, म.जि.प्रा. प्रादेशिक विभाग, नागपूर यांनी दि. १८/५/२०१८ अन्वये तांत्रिक मान्यता प्रदान केली आहे.

त्यानुषंगाने, मुख्य अभियंता, म.जि.प्रा. प्रादेशिक विभाग, नागपूर यांनी संदर्भ क्र. ५ अन्वये राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत बिडगांव व तरोडी या संयुक्त पाणी पुरवठा योजनेच्या अंदाजपत्रकास मान्यता देण्याबाबत प्रस्ताव शासनास सादर केला आहे. त्यानुसार योजनेस प्रशासकीय मंजूरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती

## शासन निर्णय

राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांतर्गत बिडगांव व तरोडी (खु) संयुक्त पाणी पुरवठा योजना, ता. कामठी, जि. नागपूर या योजनेकरीता, नागपूर पेरी अर्बन, १० गावे प्रादेशिक पाणी पुरवठा योजनेच्या मूळ मंजूर योजनेच्या बचतीतून, रु. १०१८.६४ लक्ष (ढोबळ) (**अक्षरी दहा कोटी अठरा लक्ष चौसष्ट हजार फक्त**) एवढ्या किंमतीचे अंदाजपत्रकास पुढील अटींच्या अधिन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

### अटी

१) प्रस्तुत कामाच्या स्वतंत्र निविदा काढण्यात याव्यात. प्रस्तुत कामाच्या विहीत पद्धतीने ई-निविदा मागविण्यात याव्यात. जादा किंमतीच्या निविदा स्विकृत करु नयेत.

२) योजनेत प्रस्तावित उंच पाण्याच्या टाकयांच्या क्षमतेबाबत प्रकल्पीत लोकसंख्या विचारात घेऊन मुख्य अभियंता स्तरावर तपासणी करुन खातरजमा करण्यात यावी.

३) सदर योजनेतील तक्त्यांबाबत (क्षमता निश्चिती) व ऑटोमेशन कामांबाबत CPDM स्तरावरुन पुन्हा खात्री करण्यात यावी व त्यानंतरच कामे हाती घेण्यात यावीत.

४) सदर प्रस्तावित योजनेचा समावेश ७० लिटर प्रमाणे मंजूर असलेल्या पेरी अर्बन योजनेत करावायाचा असलयाने व सदर गावे ही पेरी अर्बन असल्याने ७० लि./ प्रतिदिन याप्रमाणे योजना करण्यात यावी.

५) प्रस्तावित कामाकरीता होणारा खर्च नागपूर पेरी अर्बन १० गावे प्रादेशिक पाणी पुरवठा योजना या मंजूर योजनेच्या बचतीतूनच करण्यात यावा.

६) प्रस्तावित कामे करताना काही तांत्रिक बदल झाल्यास शासनाची मंजूरी घेण्यात यावी.

७) प्रस्तावित योजनेच्या कामांना दिलेल्या तांत्रिक मंजूरी आदेश बाब क्र. १३६, माहे मे, २०१८ मधील अटी व शर्तीचे काटेकोरपणे पालन करावे.

८) दिनांक १५ जून, २०१५ च्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार सदर वाढीव कामासाठी त्रयस्थ तांत्रिक परीक्षण करणे आवश्यक राहील.

९) योजनेच्या गुरुत्ववाहीनीकरीता रेल्वे क्रॉसिंग व रोड क्रॉसिंग व इतर सर्व परवानग्या प्राप्त झाल्याशिवाय सदर कामाच्या निविदा मागविण्यात येऊ नयेत.

१०) प्रस्तावित कामाच्या अंमलबजावणीमध्ये कोणत्याही स्वरुपाची अनियमितता, अपहार अथवा गैरव्यवहाराच्या बाबी निदर्शनास आल्यास अनियमिततेस जाबबदार संबंधीत अधिकारी/ कर्मचारी शिस्तभंगाची कारवाईस पात्र राहतील.

११) योजनेमध्ये १०० टक्के घरगुती नळजोडण्यांचा समावेश करण्यात यावा.

१२) कोणत्याही कारणाने योजनेच्या खर्चात वाढ झाल्यास वाढीव खर्चापोटी शासकीय अनुदान उपलब्ध करुन दिले जाणार नाही.

१३) गाव हगणदारीमुक्त करण्याबाबत प्रचलित धोरणानुसार कार्यवाही करण्यात यावी.

१४) योजनेची कामे कालबध्द व नियोजनबध्द पध्दतीने करण्यात यावीत.

१५) योजना स्वयंनिर्भर होण्यासाठी आवश्यक पाणी पट्टी बसविणे व त्यात वाढ करणे बंधनकारक राहील, याबाबत महाराष्ट्र जीवन प्राधिकरण व जिल्हा परिषदेच्या अधिका-यांनी ग्रामसभेत ग्रामस्थांना सविस्तर माहिती स्पष्टपणे दयावी, व त्यानंतरच योजनेच्या कामास सुरवात करावी.

१६) सदर योजनेच्या तांत्रिक मान्यतेतील अटींची, राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमांच्या तसेच संदर्भाधिन अनु.क्र. २ मधील शासन निर्णयातील मार्गदर्शक तत्वांची पुर्तता करण्यात यावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८०६०६१४२४५९३०२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suresh D. Ambekar

Digitally signed by Suresh D. Ambekar
DN: CN = Suresh D. Ambekar, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = WSSD
Date: 2018.06.06 16:13:10 +05'30'

**(सु.दे.आंबेकर)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा.मंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग.
२) मा.राज्यमंत्री, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
३) मा.विधानमंडळ सदस्य (सर्व)
४) सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
५) जिल्हाधिकारी, नागपूर.
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, नागपूर.
७) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२, नागपूर.
८) महालेखापाल, लेखापरीक्षा, महाराष्ट्र १, मुंबई
९) संचालक, पाणी व स्वच्छता सहाय संस्था(वासो), बेलापूर, नवी मुंबई.
१०) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागपूर.
११) अधीक्षक अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, नागपूर.
१२) संचालक(वित्त), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, सिडको भवन, बेलापूर,नवी मुंबई.
१३) उपसंचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, नागपूर
१४) वरिष्ट भुवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, नागपूर.
१५) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग, नागपूर.
१६) कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, नागपूर.
१७) अपर मुख्य सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१८) मु.अ. तथा वि.का.अ. पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१९) कार्यासने (पापु-०४, ०६,०७,०९,१०,१७,१८, १९ व २०), पा. पु. व स्व. वि.,मंत्रालय,मुंबई-३२.
२०) निवडनस्ती कार्यासन पापु-१३.